पुस्तकाचे नांव  : क्लिक

छायाचित्रकार : हर्षज पाटकर

लेखन, शब्दांकन : हर्षज पाटकर, इरावती पाटकर

ira.patkar@gmail.com

harshaj.patkar@gmail.com

# एक संध्याकाळ : सिडनी हार्बर ब्रिजच्या सोबतीने

कोरा करकरीत Nikkor D 300 S हातात आला आणि हात शिवशिवायला लागले. एका पोर्ट्रेटच्या एनकाउंटरसाठी. खुप दिवसांपासून सिडनीचा हार्बर ब्रिज जणू मला खुणावत होता. आतापर्यंत हजारो कॅमेरांमध्ये जेरबंद झालेला सिडनीचा हा बलदंड ब्रिज माझ्यासारख्याला काय बरं



वेगळी पोझ देऊ शकेल याचं काहूर माजलेलं मेंदूत. बरं... मला माझ्याही काही मर्यादा होत्याच की. किंबहुना कॅमेराला माझ्याहूनही... मी माझी 18-200 ची लेन्स चढवली भात्यात आणि निघालो मोहिमेवर.

हो हो... मोहिमच असते ती. जेव्हा मी फ़ोटो काढायला निघतो. अगदी मुघल सेनेचा ताफ़ा नसला तरी आमचं एक मावळेवजा सैन्य आहे. मी, म्यान केलेला माझा कॅमेरा, ट्रायपॉड, तोफ़वजा लेन्सेस, आणि बाकी बरीच सारी उपकरणं. बरं... मी एकटा जात नाही मोहिमेवर. माझी बायको इराही असते सोबत. तिची बिचारीची एक निराळीच व्यथा असते. माझ्या प्रत्येक शूटसाठी ती ट्रायपॉड सांभाळत, बॅग सांभाळत, असिस्टंट, कम सल्लागार, कम हुजऱ्या, कम हुकूमशहा, कम पि.आर. अशा अनेक भुमिका पार पाडते.

हार्बरच्च्या एनकाउंटर साठी रेकी करत सुर्यास्ता आधी दोनेक तास आम्ही परिसरात फ़िरायला सुरुवात केली. मला माझ्या मनातला फ़ोटो साकारण्यासाठी सुर्यास्ताच्या आधीची वेळ निवडायची होती.  सुर्यास्ताच्या आधी काही क्षण एक वेगळी झळाळी, एक सुंदर झिलई क्षितीजावरून उमटत जाते, ती मला टिपायची होती. रादर त्या प्रकाशात ब्रिजला नहाताना पोझ घ्यायला लावायची होती. त्याचं प्रतिबिंब पाण्यात एक गूढ आकृती साकारते, ते टिपायचं होतं. दहाविस ठिकाणी ट्रायपॉड लावून पाहिला. पण मनातला फ़ोटो काही केल्या उभा राहीना.

अखेर एक स्पॉट सापडला. जरा मनासारखा. आणि उतरत्या सूर्याच्या प्रकाशात हार्बर ब्रिजचा परिसर मला वेगळाच जाणवू लागला. संध्येची एक वेगळीच मस्तानी धुंदी

जमा व्हायला लागली. हवा रवां दवां झाली. रोजमर्रा जिंदगी संपवून माणसं घराच्या दिशेने परतू लागली. तर काही वेगळ्या मस्तीतली जिंदादिल माणसं घराबाहेर पडायला लागली. स्वतःला बेधुंद करायला. रात्रीचा दिवस करायला. अशा माणसांची जागा. हीच माझी आजची फ़्रेम.

मला माझी फ़्रेम तर सापडली. पण तरीही काही तरी गवसत नव्हतं. निसटल्यासारखं, चुकल्या चुकल्यासारखं वाटत होतं. मग जाणवलं, फ़्रेममधलं पाणी फ़ारच गडद होतंय. प्रत्यक्षात जरी नसलं तरी. म्हणजे कॉंट्रास्ट व्यवस्थित जमण्यासाठी मला थोडं अजून थांबायला हवंय. कॉंपोझिशन उठावदार होण्यासाठी थोडा काळोख आणि थोडा मानवनिर्मित प्रकाश हवाय. म्हणजे वातावरणातली ती धुंदी फ़्रेममध्ये नीट उतरेल. पण

सुर्यास्तानंतर खूप जास्त थांबलं तर मानवनिर्मित दिव्यांच्या प्रकाशात ती माझ्या फ़ोटोतली हवी असलेली नैसर्गिक चमक मी हरवून बसत होतो. थोडी चलबिचल झाली. अखेर सुर्यास्तानंतर अर्ध्या तासाने मला हवे असलेले रंगांचे बॅलन्स जमले. मी शूटसाठी तयार झालो.

आता माझ्यासमोर नवाच प्रश्न उभा होता. मला त्या गडद अंधारातही प्रत्येक ऑब्जेक्ट, तिच्या भावभावनांसह स्वच्छ दिसायला हवी होती. पण आता प्रकाश माझ्या हातात नव्हता. उपलब्ध प्रकाशात जे करता येईल तेच करायचं होतं. तेव्हा गेम करायला माझ्या हाती उरलं शटर स्पीड आणि ॲपर्चर.

स्पष्टते साठी शटरस्पीड कमी केला. जास्तीत जास्त गोष्टी फ़ोकसमध्ये येण्यासाठी मी ॲपर्चर वाढवलं. पण त्यामुळे कॅमेऱ्याने फ़ोटो कॅप्चर करायला वेळ वाढवला. आता, फ़ोटो ऑब्जेक्ट्स जर शार्प यायला हव्यात तर ॲपर्चर वाढवावे लागते. साधारण F16 किंवा त्याहून थोडे जास्त. पण मी मात्र ॲपर्चर F11 ठेवले कारण असे की हार्बर ब्रिज बराच लांब असून मध्ये पाणी होतं. त्यानंतर दुसरा मुद्दा असा की ब्रिज अचल होता आणि त्या रेस्टॉरंटमध्ये बसलेली माणसं स्थीर नसून सतत हालचाल करत होती. अशा वेळी मी कमी ठेवलेल्या शटर स्पीडमुळे ती माणसे फ़ोटोत स्थिर नसून केवळ भुतासारखि धुरकट आकृती दिसली असती. परत अजून एक मुद्दा होताच की फ़्रेममध्ये असलेल्या प्रकाशामुळे स्लो शटर स्पिड्मध्ये फ़ोटो ओव्हर एक्स्पोज म्हणजे भडक होण्याची भिती जास्त होती. मला त्या

फ़ोटोमधला जिवंतपणाही हवा होता. त्यामुळे बरेच प्रयोग करून अखेर मी सहा सेकंदाचा शटरस्पीड ठेवून फ़ोटो काढला.



फ़ोटो फ़्रेमबद्दल बोलायचं तर मुख्य ऑब्जेक्ट म्हणजे हार्बर ब्रिज हा फ्रेम मध्ये वन थर्ड बसवण्याचा प्रयत्न केलाय. मुख्य फोकस जरी ब्रिज असला तरी फोटोला जिवंतपणा आलाय ह्या बेधुंद तरूणाईमुळे . वेगवेगळ्या प्रांतांची, धर्मांची लोकं इथे एकाच वेळा एकत्र आलीयेत . एका कोपऱ्यात तिघे चौघे मित्र गळयात गळे घालुन सेल्फ़ी काढुन घेताएत. त्या हार्बर



ब्रिजच्या खाली स्वत:च्या मैत्रीचा हा फोटो आणि आठवण यादगार कर्ण्यासाठी एक तरी फोटो बनता है ना......

त्यांच्याच बाजुला काही जण ब्रिज कडे आणि त्या पाण्याकडे नुसतेच पहात बसलेले..... कसलेसे विचार डोक्य़ात घोळवत किवा मग फक्त कोरड्या मनाने. . . मनाची पाटी कॊरडी करुन नवीन रंगांना पाटीवर उतरवण्याची तयारी करतायेत....... काही जण चक्क त्या हार्बर ब्रिजला पाठ करून आकाशातले तारे मोजतायत.

किती छान वाटतं ना हे असं आकाशातले तारे बघत स्वतःच्याच आयुष्याचा हिशोब मांडताना... सुख आणि दुःखाची गोळाबेरीज ह्या लुकलुकत्या तार्‍यांवर उधळून टाकायची... म्हटलं तर हे आपले सोबती, म्हटलं तर नामानिराळे...

कितीतरी वेगवेगळी आयुष्यं ह्या एकाच फ्रेममध्ये एकत्र आली आहेत... तसं म्हटलं तर ही सगळी ह्या फ्रेममध्ये आहेत म्हणूनच ह्यांचा कुठेतरी एकमेकांशी अंधुकसा संबंध आहे... सप्तर्षी ताऱ्यांचा एकमेकांशी असावा तसा. ह्या सगळयांना जोडणारा एकच अदृश्य धागा... एकच केंद्रबिंदू म्हणजे हा हार्बर ब्रिज... हो की... निदान ह्या क्षणापुरता तरी ह्या सगळयांचा एकच केंद्रबिंदू... त्यांचा आणि माझाही.

पायऱ्यांवर लावलेले ते मंद दिवे म्हटले तर डेकोरेशन, म्हटलं तर वाटाडे, पावलांना दिशा देणारे मंद दुवेच नाही का? हे टेबलांभोवती बसलेले तऱ्हेतऱ्हेच्या संस्कृतीतले संमिश्र भावनांचे पुंजके... मध्येच पायरीवर तावातावाने जगदुनियेची चर्चा करत बसलेले ते दोघे... तर दुसरीकडे कोपऱ्यात तमाम जगदुनियेला विसरून एकमेकांच्या डोळ्यांतच जग शोधणारं ते जोडपं... त्यांच्या प्रेमाचा साक्षीदार तो हार्बर ब्रिज.



काहीजण शांत संध्याकाळी हातातल्या पेल्याचे घुटके घेत ऑफ़िसच्या राजकारणावर चर्चा करण्यात बिझी... त्यांचं तेच जग.

हार्बर ब्रिज आता असंख्य धावत्या दिव्यांनी उजळून निघाला आहे. खरंतर ते दिवे नाहिएत. ते आहेत सिडनीकर आपआपल्या गाडीत बसून घराकडे, हॉटेलकडे, पबकडे बारकडे पळत सुटलेले... त्यांच्या गाड्यांचे ते दिवे हार्बर ब्रिज उजळून टाकताएत.



ह्या एका फ़्रेममध्ये खुप काही गवसलं. पण खुपसारं निसटलंही. एक फ़ोटोग्राफ़र हा उत्तम विद्यार्थी असायलाच हवा. प्रत्येक फ़ोटो तुम्हाला नवीन काहीतरी शिकवतो. कारण प्रत्येक क्षण, प्रत्येक ऍंगल, हा एक नवीन अनुभव असतो ना! अगदी तसाच, प्रत्येक क्लिक हा आधीच्यापेक्षा वेगळा... कारण प्रत्येक वेळी गाठीशी असलेला अनुभव बरोबर घेऊन तो क्षण साकारायचा असतो आणि एक नवीन अनुभव गाठीला लावायचा असतो.

मला ह्या फ़्रेममधून अपेक्षित होतं ते जिवंतपण... भावनांचे रंग... जे त्या हार्बर ब्रिजच्या सौंदर्यालाही फ़ुलवत नेतील. माझ्या फ़ोटोलाही एक मुर्त आकार देतील. परत फ़ोटोग्राफ़ी ही माणसामाणसागणिक बदलत जाणारी. मला भावलेली भावना कदाचित तुम्हाला वेगळी भासेलही. अट्टाहास नाही माझा की मला जे दिसलं तेच तुम्हाला दिसावं

असा. या फ़्रेममध्येही मला न दिसलेलं असं काही तुम्हाला दिसेलही आणि भावेलही. कदाचित ते तुम्हाला अतिशय महत्त्वाचं वाटेल आणि “या हर्षजने याबद्दल काहीच उल्लेख का केला नाही” असा अचंबाही वाटेल.

माझ्यापुरतं म्हणाल तर हीच ती एक रम्य संध्याकाळ... आम्ही सर्वांनी एका फ़ोटोमध्ये एकत्र जगलेली. सिडनीच्या हार्बर ब्रिजच्या साक्षीने...!

# छायाचित्रकार लेखकांना आवाहन

फ़ोटोग्राफ़ी ही खुप कॉंप्लेक्स कला आहे. एखाद्या चांगल्या फ़ोटोकडे डोळसपणे कसे बघावे हे स्मजून घ्यावे लागते. आता तर प्रत्येकच जण मोबाईलवरून फ़ोटो काढतो. पण प्रोफ़ेशनल ते प्रोफ़ेशनल. त्याची डेप्थ समजून घेता यावी यासाठी आपल्याकडुन मदत हवी. आपले निवडक फ़ोटो व त्यावरचे राइट अप आमच्याकडे पाठवा. त्यावर रितसर पुस्तक बनवून आपल्या अधिकारांसह ते प्रसिद्ध करू.

वाचक मित्रांना आवाहन. पुस्तक कसं वाटलं ते कळवा. तुमचे अभिप्राय लाख मोलाचे आहेत.

धन्यवाद

आपले नम्र

टीम ई साहित्य